**सहकारी सूतगिरणी व सहकारी यंत्रमाग संस्था यांना एक वेळची निर्गमन योजना (One time exit policy) लागू करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सूतगि ३३१८/प्र.क्र.२८/टेक्स १ (अ)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०७ जून, २०१८.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः धोरण २०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ दि.१५ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार जाहिर करण्यात आले आहे. सदर धोरणात सहकारी सूतगिरण्यांसाठी अर्थसहाय्याचा १०:३०:६० असा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. नवीन वस्त्रोद्योग धोरणामध्ये सहकारी यंत्रमाग संस्था व सहकारी सूतगिरण्यांसाठी एक वेळची निर्गमन योजना स्विकारण्यात आली आहे. एक वेळची निर्गमन योजना (One time exit policy) बाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

## शासन निर्णय :-

वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ नुसार राज्यातील सहकारी यंत्रमाग संस्था व सहकारी सूतगिरण्यांसाठी "एक वेळची निर्गमन योजना" (One time exit policy) लागू करण्यात येत आहे. "एक वेळची निर्गमन योजना" (One time exit policy) याचा लाभ घेण्यासाठी खालील अटींची पूर्तता करणे बंधनकारक असेल.

**सदर अटी खालील प्रमाणे आहेत :-**

१) राज्य शासनाने सहकारी यंत्रमाग संस्था व सहकारी सूतगिरण्यांसाठी लागू केलेल्या एक वेळच्या निर्गमन योजनेचा सदर संस्थांना लाभ घ्यावायाचा झाल्यास सदर संस्थांनी त्यांना शासनाने दिलेले भागभांडवल, शासकीय कर्ज / रा.स.वि.नि. कर्ज, कर्जावरील व्याजाची रक्कम, शासनाने प्रदान केलेल्या बिनव्याजी कर्जाची रक्कम इत्यादी परत केल्यास अशा संस्थांना शासनाकडून निर्गमनाची (exit) ची परवानगी देण्यात येईल, त्यानुसार अशा संस्थेचे शासनाप्रती असलेले दायित्व संपुष्टात येईल व अशी संस्था खाजगी संस्था म्हणून काम करु शकेल.

२) सहकारी सूतगिरण्यां संस्था / सहकारी यंत्रमाग यांचेकडे उपलब्ध असलेल्या जमिनीच्या औद्योगिक वापरात बदल करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या प्रचलित नियमानुसार देय होणारी रक्कम शासनास अदा करणे बंधनकारक असेल, रक्कम अदा केल्यानंतरच अशा प्रस्तावांना शासनाकडून परवानगी देण्यात येईल.

३) सहकारी सूतगिरण्यां / यंत्रमाग संस्था यांना एक वेळची निर्गमन योजनेचा लाभ घेण्यासाठी इतर वित्तीय संस्था / बँकेकडून कर्ज घेतलेले असल्यास अशा वित्तीय संस्था / बँकेचे ना-हरकत प्रमाणपत्र (NOC) सादर करणे बंधनकारक असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०७१५२९१३०१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d94289 66ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2018.06.07 15:32:10 +05'30'

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
५) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
६) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
७) प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,
८) कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
९) कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१०) वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,
११) नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,
१२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१४) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर, औरंगाबाद, नागपूर, मुंबई,
१५) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (मार्फत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म. रा. पुणे,
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
१९) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,
२०) चेअरमन, सर्व सहकारी सूतगिरण्यां (संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर)
२१) निवडनस्ती (टेक्स १ अ /ब).